पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील अपर पोलीस आयुक्त (मुख्यालय ) हे पद पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात वर्ग करणेबाबत.

महाराष्ट शासन

गृह विभाग,

शासन निर्णय क्र.अेपीओ ३११०/९७८/प्र क्र ४८७/पोल-३

मंत्रालय, मुंबई- ४० ०३२

दिनांक :- १५ नोव्हेंबर. २०१०

वाचा :-१) शासन निर्णय क्रमांक-एपीओ ३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि. ०७/०८/२००८

२) शासन निर्णय क्र. सीटीई ३११०/६१७/प्र क्र ३२६/पोल-३ दिनांक ३०/०७/२०१०

३) पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे पत्र क्र जा क्र पोआ/नमुं/पशा/पुनर्र/३८३३/२०१० दिनांक २७/०८/२०१०

**प्रस्तावना :-**

नवी मुंबई आयुक्तालयातील वाढती वाहतूक व्यवस्था, वाढत्या गुन्हयांचे प्रमाण, कायदा व सुव्यवस्थेची दिवसेंदिवस गंभीर होणारी समस्या, सिडको कडून वेळोवेळी उभारण्यात येणारे नवीन गृह प्रकल्प, परिणामी यामुळे वाढणारी लोकसंख्या, या आयुक्तालयाच्या हद्दीतून जाणारे राष्ट्रीय व राज्य महामार्ग, त्यावरील रहदारी, विविध वाहतुकीच्या समस्या, तसेच हद्दीतील संवेदनशील महत्वाची ठिकाणे व मर्मस्थळे, जे.एन.पी.टी, एस.ई.झेड व नव्याने होऊ घातलेले आंतरराष्ट्रीय दर्जाचे विमानतळ , अतिरेक्याकडून हल्ला होण्याची शक्यता या सर्व बाबींचा विचार करता नवी मुंबई हे मेगासिटी (Mega City ) पोलीसींग अंतर्गत समाविष्ट करण्यात आले आहे. वाढत्या कामाच्या व्याप लक्षात घेता, कायदा व सुव्यवस्था सक्षमपणे हाताळता यावी, त्याचप्रमाणे पोलीस आयुक्त, नवी मुंबई हे पद अपर पोलीस महासंचालक दर्जाचे झाले असल्याने पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवर अपर पोलीस आयुक्त हे पद निर्माण होणे अत्यंत आवश्यक आहे. सदर पद निर्मितीस काही कालावधी लागण्याची शक्यता असल्याने पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवरील अपर पोलीस आयुक्त (मुख्यालय) हे पद पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात वर्ग करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावाचा सर्वांगीनी विचार करुन पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवरील शासन निर्णय दिनांक ०७/०८/२००८ अन्वये निर्माण केलेले अपर पोलीस आयुक्त (मुख्यालय) हे पद पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात वर्ग करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२.	याकरिता येणारा खर्च

२०५५, पोलीस

(००) १०९ जिल्हा पोलीस

(००)

(००) (०१) जिल्हा पोलीस दल (दत्तमत २०५५०१६८)

या लेखाशीर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजूर अनुदानातून व पूढे दर वर्षी मंजूर करण्यात येणा-या अनुदानातून करण्यात यावा.

३.	सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१११५१६३४०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

(प्र. मो. वानखडे)

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

विशेष पोलीस महानिरिक्षक, कोकण परिक्षेत्र कोकण

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई

पोलीस आयुक्त, नवी मुंबई

प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा-१), महाराष्ट्र राज्य, मुंबई

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा-१), मुंबई

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

कार्यासन पोल-१, पोल-४, पोल-७ गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

निवड नस्ती (कार्यासन पोल-३)